शहरी गरीबांना मुलभूत सुविधा पुरविणे (बी.एस.यु.पी.) या योजनेसाठीच्या सन २०१०-११ या वर्षाकरीता राज्य शासनाच्या हिश्श्याची तरतूद वितरीत करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**,
गृहनिर्माण विभाग,
शासन निर्णय, क्रमांक-जनेयो-२०११/प्र.क्र.१८/गृनिधो-२(सेल),
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दि : १८.३.२०११

**वाचा** :
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.खर्चनि-१०.६०/प्र.क्र.१/अर्थोपाय, दि. २०.४.२००६
२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र.जनेयो-२००७/प्र.क्र.५२/गृनिधो-२, दि. २५.०६.०७
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पूरक-१०.७०/प्र.क्र.२३१/अर्थसंकल्प-३, दि. १०.८.०७
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.खर्चनि-१०. ०७/प्र.क्र.१४/अर्थोपाय, दि.२.०६.०७
५) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र.जनेयो-२००६/प्र.क्र.४६/गृनिधो-२, दि. १८.०९.०६
६) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र.केनिधी-२००७/प्र.क्र.११७/गृनिधो-२,दि. १४.०९. ०७
७) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्र.जनयो-२००८/प्र.क्र.८३/गृनिधो-२,दि.१५.०३.०८.
८) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग,क्र.जनेयो-२००८/प्र.क्र.३८/गृनिधो-२, दि. ३१.०३.०८
९) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग ,क्र.जनेयो-२००८/प्र.क्र.६८/गृनिधो-२, दि. ८.०७.०८
१०) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग ,क्र.जनयो-२००८/प्र.क्र.६८/गृनिधो-२, दि.२१.०२.०८
११) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग ,क्र.वाटप प्र.क्र.४०/अर्थसंकल्प-१/,दि.२६.०३.०९
१२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग ,क्र.जनयो-२००८/प्र.क्र.६८/गृनिधो-२,दि.३१.०३.०९
१३) शासनाचे पत्र क्र.संकीर्ण २००९/आर ५०५/ गृनिधो-२(सेल) दि.०९.०७.०९
१४) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग,क्र.जनयो-२००९/प्र.क्र.६६/गृनिधो-२ सेल, दि.२६.११.०९
१५) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग,क्र.जनयो-२००९/प्र.क्र.६६/गृनिधो-२ सेल, दि.१९.०३.१०
१६) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग,क्र.जनयो-२००९/प्र.क्र.६६/गृनिधो-२ सेल,दि.३०.०३.१०
१७) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग,क्र.जनयो-२०१०/प्रक्र-१०४ अ/गृनिधो-२ सेल, दि.३१.०८.१०
१८)शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग,क्र.जनयो-२०१०/प्रक्र-१०४/गृनिधो-२/सेल, दि.२४.१२.१०
१९)शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग,क्र.जनयो-२०१०/प्रक्र-१०४/गृनिधो-२/सेल, दि.२१.१.११

**शासन निर्णय** :

केंद्र शासनाच्या गृहनिर्माण व शहरी गरीबी निर्मुलन मंत्रालयाने शहरी भागातील झोपडपट्टीवासियांचे जीवनमान उंचावण्यासाठी घोषित झोपडपट्टयांमध्ये राहणा-या तसेच झोपडपट्टयातील आरोग्यास अपायकारक अशा परिस्थितीत राहणाऱ्या झोपडपट्टीवासियांसाठी जवाहरलाल नेहरु राष्ट्रिय नागरी पुनरुत्थान अभियान(JN-NURM) सरु केले आहे. या अभियानांतर्गत "शहरी गरीबांना मुलभूत सुविधा पुरविणे," या उपकार्यक्रमाचा समावेश करण्यात आला आहे. शहरी गरीबांना मुलभूत सुविधा पुरविणे हा उप कार्यक्रम राज्यातील मुंबई, पुणे, नागपूर, नाशिक, नांदेड या पाच नागरी समुहांमध्ये संदर्भाधिन दि.२५ जून,२००७ च्या शासन निर्णयान्वये अंमलबजावणी करण्यात येत आहे. शहरी गरीबांकरिता मुलभूत सुविधा पुरविणे हे या कार्यक्रमाचे मुलभूत उद्दिष्ट आहे.

२. केंद्र शासनाच्या निकषाप्रमाणे बीएसयूपी उपकार्यक्रमांतर्गत केंद्र व राज्य शासन (अंमलबजावणी यंत्रणा व लाभार्थ्यांच्या हिश्श्यासह) यांनी प्रत्येकी ५० टक्के या प्रमाणात निधि खर्च करावयाचा आहे. या योजनेची अंमलबजावणी करतांना शासनाने महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाची राज्यस्तरीय सुकाणू अभिकरण (नोडल एजन्सी) म्हणून संदर्भ क्र.४ अन्वये नेमणूक केली आहे.

३. " शहरी गरीबांना मुलभूत सुविधा पुरविणे " या कार्यक्रमांतर्गत सन २०१०-११ या वित्तीय वर्षामध्ये राज्य शासनाच्या हिश्यापोटी रु.१९५०० लाख इतकी एकूण तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली आहे. आता वित्त विभागाने दिलेल्या मंजुरीनुसार प्राप्त झालेल्या तरतूदीमधून सुकाणू अभिकरणाव्दारे वेळोवेळी घेतलेल्या प्रकल्पांच्या आढाव्याअंती केंद्र शासनाने वितरीत केलेल्या हिश्यांच्या अनुषंगाने कामाच्या प्रगतीनूसार राज्य शासनाच्या हिश्यापोटी रु.१९३२७.५३ लक्ष (रुपये एकोनिस हजार तिनशे सत्ताविस लक्ष त्रेपन्न हजार फक्त) इतकी रक्कम सोबतच्या विवरणपत्रानुसार संबंधित नागरी स्वराज्य संस्थांना/अंमलबजावणी यंत्रणाला वितरीत करण्यासाठी राज्यस्तरीय सुकाणू अभिकरणास या शासन निर्णयाद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

४. प्राधिकरणाने सदरची रक्कम खर्च करण्यासाठी अवर सचिव, गृहनिर्माण विभाग(आहरण व संवितरण अधिकारी) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले विहित प्रपत्रातील सदर रकमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालयास याच महिन्यात सादर करण्याची दक्षता घ्यावी.

५. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांचे मार्फत प्रस्तुत निधी अंमलबजावणी करणाऱ्या नागरी स्वराज्य संस्था यांना सदर योजनेचा निधी वितरीत करताना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी. ज्या प्रयोजनासाठी केंद्र शासनाने निधी उपलब्ध करुन दिला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा विनियोग करणे आवश्यक आहे व सदर तरतूद केंद्र शासनाच्या निकषानुसार खर्च होईल याची दक्षता घ्यावी. सदर रकमेचे वितरण MP-SIMS या शासनाच्या संगणक प्रणालीवर नोंदवण्याची जबाबदारीही सुकाणू अभिकरणाची राहील.

६. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणावर योजनेअंतर्गत होणाऱ्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत केंद्र व राज्य शासनास सादर करणे बंधनकारक राहिल. जर वितरीत केलेली रक्कम केंद्र व राज्य शासनाने ज्या प्रयोजनासाठी वितरीत केली आहे, त्या प्रयोजनासाठी वापरली नाही, तर सदर रक्कम प्राधिकरणाकडून व्याजासह वसूल करण्यात येईल.

७. या अनुदानाविषयीचे लेखे जर केंद्र शासन/राज्य शासन/महालेखापाल यांनी मागविल्यास ते त्यांच्या माहितीकरीता/तपासणीकरीता सादर करण्याची प्राधिकरणावर जबाबदारी असेल. सदर लेखाशिर्षकाचे दर महिन्याअखेरचा ताळमेळ महालेखापाल कार्यालयातील लेख्याशी ठेऊन त्याबाबतचा अहवाल शासनास दर महिनाअखेर सादर करण्यात यावा.

८. या प्रयोजनावर होणारा खर्च मागणी क्र.क्यू-३ मुख्य लेखाशिर्ष २२१६-गृहनिर्माण-८०, सर्वसाधारण - १०३, गृहनिर्माण मंडळे महामंडळे इत्यादींना सहाय्य- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०४)(०१) शहरी गरीबांना मुलभूत सुविधा पुरविणे (राज्य हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१६ १४२५) दत्तमत या लेखाशीर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

९. हा शासन निर्णय वित्त विभागांतर्गत व्यय-३ कार्यासनाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.७७/व्यय-३, दि.९.२.२०११ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार व नियोजन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११३१५२३०४१९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(प्र. ल.पाठक)
शासनाचे उप सचिव.

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, (पत्राने)

२. मा.मख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
६. मुख्य अभियंता-२, राज्यस्तरीय समन्वय अधिकारी, जेएनएनयुआरएम, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
७. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ ( लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, नागपूर,
९. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोंकण विभाग, नवी मुंबई,
१०. उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा कोंकण विभाग, नवी मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१२. वित्त नियंत्रक/मुख्य अभियंता-१, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे, मुंबई-४०० ०५१.
१४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व), मुंबई ५१.
१५. मुख्य अधिकारी, पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, पुणे/नाशिक/ औरंगाबाद /नागपूर,
१६. वित्त विभाग (व्यय-३ कार्यासन, अर्थसंकल्प १७ व अर्थोपाय कार्यासन), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१७. नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८. सामाजिक न्याय व सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१९. आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२०. महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२१. नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२२. उप संचालक (एम) भारत सरकार, शहर कार्या आणि रोजगार मंत्रालय, शहरी रोजगार व दारिद्रय निर्मुलन विभाग( संनियंत्रण कक्ष) निर्माण भवन, नवी दिल्ली (नोंदणीकृत डाकेने)
२३. सह संचालक, लेखा व कोषागारे कॉम्प्युटर सेल, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई,
२४. उप सचिव / सर्व अवर सचिव /कक्ष अधिकारी , गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२५. अवर सचिव/रोखशाखा व आहरण व संवितरण अधिकारी , गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
२६. संबंधित महानगरपालिका/नगरपालिका,
२७. निवड नस्ती / गृनिधो-२(सेल) कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

शासन निर्णय क्रमांक जनेयो-२०११/प्र.क्र.१८/गृनिधो-२(सेल) , दि.१८.३.२०११

विवरणपत्र "अ"

BSUP प्रकल्पाकरीता राज्य शासनाच्या हिश्याच्या रक्कमेचे वितरण. (रु.लाखात)

| अ.क्र. | प्रकल्पाचे स्थान व नाव | एकूण राज्य हिस्सा | वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | पुणे-हडपसर | २७७९.०६ | ४१७.६२ |
| २ | पुणे-वारजे | १८९०.५७ | ३६७.५३ |
| ३ | पुणे-येरवडा | ३८००.६४ | ९५०.१६ |
| ४ | पिंपरी-चिंचवड नगघर विकास प्राधिकरण | ३२३३.४१ | ८९४.६५ |
| ५ | पिंपरी-चिंचवड- I | २७०३.०२ | ६७५.७६ |
| ६ | पिंपरी-चिंचवड- II | २७०३.०२ | ६७५.७६ |
| ७ | पिंपरी-चिंचवड-उद्योगनगर | ५२६.८८ | १३१.७३ |
| ८ | पिंपरी-चिंचवड- मिलिंदनगर | ८३१.३३ | २०७.८४ |
| ९ | पिंपरी-चिंचवड- विठ्ठलनगर | ९४८.३८ | २३७.१० |
| १० | पिंपरी-चिंचवड-अजंठानगर | ९३५.९३ | २३३.९९ |
| ११ | पिंपरी-चिंचवड | ७४८.२२ | १८७.०५ |
| १२ | नाशिक पंचवटी | ११७५.९३ | ७८.४० |
| १३ | नाशिक चिंचोले पॅकेज I | १००१.७१ | ४५०.८५ |
| १४ | नाशिक चिंचोले पॅकेज II, III | २२६४.७५ | ५६६.१९ |
| १५ | नाशिक पश्चिम | २१७.७८ | ६.६६ |
| १६ | नाशिक सातपूर | ४३५.५३ | २५.२२ |
| १७ | नाशिक वडाळा | ३९१.९८ | ९८.०० |
| १८ | नागपूर जट-तिरोडी | ३५१.४० | ८७.८५ |
| १९ | नागपूर III | १६२४.६७ | ४०६.१७ |
| २० | नागपूर II | १३४७.१४ | ३३६.७९ |
| २१ | नागपूर पश्चिम | १३५८.८६ | ३३.९० |
| २२ | नागपूर- IV | ६७४.०६ | १६८.५२ |
| २३ | नागपूर V | ११६५.२७ | २९१.३२ |
| २४ | नागपूर VI | ७८६.०७ | १९६.५२ |
| २५ | नांदेड- I | १०५५.९८ | २५३.९९ |
| २६ | नांदेड- II | २९६०.३८ | ७४०.०९ |
| २७ | नांदेड- IV | ७६८.४१ | १९२.१० |
| २८ | नांदेड- V | ३९६.३३ | ९९.५८ |
| २९ | नांदेड- VI | ३४८.९८ | ८७.२५ |
| ३० | नांदेड- VII | ५१७.२६ | १२९.३२ |
| ३१ | नांदेड- VIII | २९२.७० | ७३.१८ |
| ३२ | नांदेड- IX | ६८४.९५ | १७१.२४ |
| ३३ | नांदेड - तिरोडा | ३०८९.७८ | ७७२.४५ |
| ३४ | नांदेड टेक्सटाईल मिल | ५७५५.३४ | १४३८.८४ |
| ३५ | ठाणे-II | ८८५.३५ | ४४२.५० |
| ३६ | नवी मुंबई | ८०४१.८५ | १९२.५४ |
| ३७ | कुळगाव-बदलापूर | १९६३.२५ | ४९०.८१ |
| ३८ | कल्याण-डोंबिवली I | ८७६०.८९ | २१९०.२२ |
| ३९ | कल्याण-डोंबिवली II | ३५८१.३७ | ८९५.३४ |
| ४० | उल्हासनगर | ८९४.६७ | २२३.६७ |
| ४१ | कल्याण-डोंबिवली III | १९८३.६१ | ४९५.९० |
| ४२ | कल्याण-डोंबिवली IV | २९९५.५९ | ७४८.९० |
| ४३ | मिरा-भाइंदर | ७८५६.११ | १९६४.०३ |
| | | ८३९४९.३५ | १९३२७.५३ |